**सन २०२३-२४ या वर्षासाठी क्रीडा सुविधा निर्मितीसाठी आर्थिक सहाय्य योजनेंतर्गत आर्थिक सहाय्य वितरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक :- क्रीडासु-३०२३/प्र.क्र.७८/कीयुसे-१,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक : १२ जूलै , २०२३

वाचा:-

१. शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र. राक्रीधो २०१२/प्र.क्र. २६०/क्रीयुसे-१, दि. ०१ मार्च, २०१४.
२. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थस-२०२३/प्र.क्र. ४०/अर्थ-३ दिनांक १२ एप्रिल,२०२३.
३. शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र. क्रीडासु/प्र.क्र.७८/क्रीयसे-१, दिनांक ३ जूलै .२०२३
४. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र. क्रीसुनि/ आर्थिक सहाय्य२४-२०२३//का-९/१७८८, दि.१० जूलै, २०२३.

प्रस्तावना:-

"क्रीडा सुविधा निर्मितीसाठी आर्थिक सहाय्य करणे" ही क्रीडा धोरणातील एक महत्वाची शिफारस आहे. दर्जेदार क्रीडा सुविधा निर्माण करुन त्याद्वारे खेळाडूंच्या कामगिरीत वाढ करुन राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय खेळाडू निर्माण करण्यास चालना देणे, हे या योजनेचे उद्दिष्ट आहे. या संदर्भातील सविस्तर कार्यपध्दती उपरोक्त संदर्भाधीन क्र. (१) येथील शासन निर्णय दिनांक ०१ मार्च, २०१४ अन्वये विहीत करण्यात आली आहे. राज्यातील खाजगी/शासनाच्या मार्फत चालविण्यात येणाऱ्या व राज्य शासनाच्या संबंधित विभागांनी मान्यता दिलेल्या शैक्षणिक संस्था, स्थानिक/नागरी स्वराज्य संस्था, स्थानिक स्वराज्य संस्थेच्या शाळा, कनिष्ठ महाविद्यालय,आदिवासी विकास विभागाच्या आश्रमशाळा, राज्य शासनाची विभागीय/जिल्हा/तालुका क्रीडा संकुले, विविध खेळांच्या विकासासाठी कार्यरत असणाऱ्या व सार्वजनिक विश्वस्त अधिनियम १९५० किंवा संस्था नोंदणी अधिनियम १८६० अन्वये पंजीबध्द असतील अशा व्यायाम संस्था, क्रीडा मंडळे, क्रीडा संघटना इत्यादींना क्रीडा सुविधा निर्मितीस ७५:२५ (शासन: संस्था) याप्रमाणे अनुदान देण्यास तसेच क्रीडा साहित्यासाठी अनुदान देण्यास संदर्भाधीन क्र.१ च्या शासन निर्णयान्वये विहित अटी व शर्तींच्या आधारे मान्यता देण्यात आली आहे.

आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, पुणे यांचेकडून शासनास प्राप्त झालेल्या विविध संस्थांच्या प्रस्तावांना संदर्भाधीन क्र. (२) येथील शासन निर्णयांन्वये तत्वत: प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. उपरोक्त प्रशासकीय मान्यता देण्यात आलेल्या संस्थांना अनुदान उपलब्ध करुन देण्याकरीता सन २०२३-२४ या आर्थिक वर्षासाठी अर्थसंकल्पीय निधीतून वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय**:-

सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाकरीता क्रीडा सुविधा निर्मितीसाठी आर्थिक सहाय्य या योजनेसाठी अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या तरतूदीमधून रु. ७४.०० लक्ष ( अक्षरी रुपये चौरयाहत्तर लक्ष फक्त ) इतकी तरतूद सोबतच्या विवरणपत्र- अ मध्ये दर्शविण्यात आल्याप्रमाणे संबंधित संस्थांना वितरीत करण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे. सदर मान्यता खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

१) शासन निर्णय दिनांक ०१ मार्च, २०१४ मधील बाब क्र. ४ (ब) मध्ये नमूद क्रीडा साहित्य खरेदीसाठी अनुदान मंजुरीच्या सर्व अटी व शर्तीच्या अधिन राहून संबंधित संस्थांना अनुदान वितरीत करण्याची कार्यवाही करावी.

२) संबंधित संस्थेस सोबतच्या परिशिष्ट-अ या विवरणपत्रात दर्शविल्याप्रमाणे अनुदान वितरित झाल्यानंतर प्रकल्प पूर्णत्वाचा दाखला, प्रकल्पाच्या छायाचित्रांसह व उपयोगीता प्रमाणपत्रासह लवकरात लवकर व कमाल १ वर्षाच्या कालमर्यादेत सादर करणे बंधनकारक राहील, अन्यथा वितरित अनुदान शासनाच्या प्रचलित दंडनीय व्याज दराने अनुदान वितरीत झाल्याच्या दिनांकापासून वसुल करण्यात येईल, ही अट मान्य असल्याचे हमीपत्र प्रतिज्ञापत्राद्वारे संबंधित संस्थेकडून घेण्यात यावे.

३) शासन अनुदान खर्च करुन विनियोग प्रमाणपत्र सादर करणे बंधनकारक राहील.

४) संदर्भाधीन क्र.१ येथील शासन निर्णय दि.०१.०३.२०१४ येथील परि.४ (ब) (१०) नुसार क्रीडा साहित्य अनुदानाकरिता शासकीय संस्थांना स्वहिश्शाची अट लागू राहणार नाही.

२. उपरोक्त अटींच्या अधीन राहून सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाकरीता क्रीडा सुविधा निर्मितीसाठी आर्थिक सहाय्य योजना याकरिता अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या तरतूदीमधून रु. ७४.०० लक्ष ( अक्षरी रुपये चौरयाहत्तर लक्ष फक्त ) इतका निधी वितरीत करण्यात यावा.

३. क्रीडा सुविधा निर्मितीकरीता आर्थिक सहाय्य या योजनेसंदर्भात होणारा खर्च सन २०२३-२४ या आर्थिक वर्षासाठी "मागणी क्र. ई-३ लेखाशिर्ष २२०४, क्रीडा व युवक सेवा, १०४ क्रीडा व खेळ, (४०) क्रीडा सुविधा, (४०) (०१) क्रीडा सुविधा निर्माण करण्यासाठी सहाय्य (कार्यक्रम) (२२०४ ५७०६), ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर)" या लेखाशीर्षाखालील उपलब्ध तरतूदीमधून करण्यात यावा.

४. वित्त विभागाने वेळोवेळी निधी वितरणाबाबत दिलेल्या निदेशानुसार उपरोक्त तरतूद खर्च करण्याबाबतची कार्यवाही करण्यात यावी. याकरीता संबंधित जिल्ह्याचे जिल्हा क्रीडा अधिकारी यांना आहरण व संवितरण अधिकारी व आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय, वित्त विभाग, शासन परिपत्रक, क्र.अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दि. ०४ एप्रिल, २०२२ अन्वये, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका भाग-१, वित्त विभाग, शासन निर्णय, क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दिनांक १७.०४.२०१५ अन्वये प्रशासकीय विभागांना प्राप्त झालेल्या अधिकारांतर्गत किंवा वेळोवेळी वित्तीय अधिकार नियम पुस्तिका भाग-२ अन्वये प्रदान केलेल्या वित्तीय अधिकारांतर्गत निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०७१२१४५८१५७१२१ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RANSING ANANDRAO DERE

Digitally signed by RANSING ANANDRAO DERE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=9651a3c25d5e1f106e47059f72760ff520f9b00f67c3e9186e40ed4bd4fbaee6, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=41EC78BC14804BABDC24C7FD31BA9FBF63804F499D4335774E27423E40136397, cn=RANSING ANANDRAO DERE
Date: 2023.07.12 15:00:27 +05'30'

**( रणसिंग डेरे )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपालांचे सचिव, राज्यपालांचे कार्यालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय,मुंबई
३. मा.उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय,मुंबई
४. मा.मंत्री (क्रीडा व युवक कल्याण), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा.विरोधी पक्षनेता (विधानसभा / विधानपरिषद) यांचे स्वीय सहायक, मुंबई.
६. सर्व मा. विधानपरिषद/ विधानसभा सदस्य, महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई
७. मा. मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक
८. मा. प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, यांचे स्वीय सहायक
९. मा. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक
१०. मा. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक
११. मा. महालेखापाल (लेखाव अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर
१२. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१३. विभागीय उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा, नाशिक
१४. जिल्हा क्रीडा अधिकारी, जळगांव
१५. वित्त विभाग (कार्यासन व्यय-५/अर्थसंकल्प-८) मंत्रालय, मुंबई
१६. नियोजन विभाग (कार्यासन-१४७१) मंत्रालय, मुंबई
१७. निवड नस्ती (क्रीयुसे-१).

## परिशिष्ट- अ(क्रीडा साहित्य प्रस्ताव)

| अ. क्र | संस्थेचे नाव | क्रीडा साहित्य प्रकार | शासन निर्णयानुसार अनुदान मर्यादा | राज्य शासन हिस्सा | संस्थेचा हिस्सा | राज्य शासना कडून देय अनुदान * |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| १ | ग्रा. पं. ओझर बु.,ता. जामनेर, जि. जळगाव | कुस्ती मॅट (१२x१२मी.सेट सिंथेटिक कव्हरसह) | ५.०० लक्ष | ३.७५ लक्ष | शासन निर्णयातील परि. ४ (ब) १० नुसार शासकीय संस्थांना स्वहिस्याची अट लागू नाही. | ५.०० लक्ष |
| २ | ग्रा.पं. तळेगाव, ता. जामनेर, जि. जळगाव | कुस्ती मॅट (१२ x १२ मी. सेट सिथेटिक कव्हरसह) | ५.०० लक्ष | ३.७५ लक्ष | | ५.०० लक्ष |
| ३ | ग्रा. पं. तोंडापूर, ता. जामनेर, जि. जळगाव | कुस्ती मॅट (१२ x १२ मी. सेट सिंथेटिक कव्हरसह) | ५.०० लक्ष | ३.७५ लक्ष | | ५.०० लक्ष |
| ४ | ग्रा. पं. तोंडापूर. ता. जामनेर, जि. जळगाव | कबड्डी सिंथेटिक मॅट | ४.०० लक्ष | ३.०० लक्ष | | ४.०० लक्ष |
| ५ | ग्रा.पं. वाकी खु. ता. जामनेर, जि. जळगाव | कुस्ती मॅट (१२ x १२ मी. सेट सिंथेटिक कव्हरसह) | ५.०० लक्ष | ३.७५ लक्ष | | ५.०० लक्ष |
| ६ | ग्रा.पं.रांजणी, ता. जामनेर, जि. जळगाव | कबड्डी सिंथेटिक मॅट | ४.०० लक्ष | ३.०० लक्ष | | ४.०० लक्ष |
| ७ | ग्रा.पं.मालदाभाडी, ता.जामनेर जि. जळगाव | कबड्डी सिंथेटिक मॅट | ४.०० लक्ष | ३.०० लक्ष | | ४.०० लक्ष |
| ८ | ग्रा.पं.गोद्री, ता.जामनेर जि. जळगाव | कबड्डी सिंथेटिक मॅट | ४.०० लक्ष | ३.०० लक्ष | | ४.०० लक्ष |
| ९ | ग्रा.पं.गोद्री, ता.जामनेर जि. जळगाव | कुस्ती मॅट (१२ x १२ मी.सेट सिंथेटिक कव्हरसह) | ५.०० लक्ष | ३.७५ लक्ष | | ५.०० लक्ष |
| १० | ग्रा.पं. सुनसगांव ता. जामनेर जि. जळगांव | कबड्डी सिंथेटिक मॅट | ४.०० लक्ष | ३.०० लक्ष | | ४.०० लक्ष |
| ११ | ग्रा.पं. ढालगाव, ता.जामनेर जि. जळगाव | कबड्डी सिंथेटिक मॅट | ४.०० लक्ष | ३.०० लक्ष | | ४.०० लक्ष |
| १२ | ग्रा पं.सामरोद, ता. | कबड्डी सिंथेटिक मॅट | ४.०० लक्ष | ३.०० लक्ष | | ४.०० लक्ष |

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| | जामनेर जि. जळगाव | | | | | |
| १३ | ग्रा.पं. किन्ही ता. जामनेर, जि. जळगाव | कबड्डी सिंथेटिक मॅट | ४.०० लक्ष | ३.०० लक्ष | | ४.०० लक्ष |
| १४ | ग्रा.पं. पाळधी, ता. जामनेर, जि. जळगाव | कुस्ती मॅट (१२ x १२ मी. सेट सिंथेटिक कव्हरसह ) | ५.०० लक्ष | ३.७५ लक्ष | | ५.०० लक्ष |
| १५ | ग्रा.पं. पाळधी, ता. जामनेर, जि. जळगाव | कबड्डी सिंथेटिक मॅट | ४.०० लक्ष | ३.०० लक्ष | | ४.०० लक्ष |
| १६ | ग्रा.पं. हिंगणे बु. ता. जामनेर, जि. जळगाव | कबड्डी सिंथेटिक मॅट | ४.०० लक्ष | ३.०० लक्ष | | ४.०० लक्ष |
| १७ | ग्रा. पं. गारखेडा खु, ता. जामनेर, जि. जळगाव | कबड्डी सिंथेटिक मॅट | ४.०० लक्ष | ३.०० लक्ष | | ४.०० लक्ष |
| | | | | | एकुण | ७४.०० लक्ष |

* क्रीडा साहित्याची स्तंभ क्र. ४ येथील एकूण अनुदान मर्यादा विचारात घेऊन व शासकीय संस्थांना स्वहिश्शाची अट नसल्याने वरील स्तंभ क्र.७ नुसार अनुदान मंजूर करण्यात येत आहे..